ओम शिक्षण संस्था, सुभाषनगर, किनवट, जि.नांदेड संचलित सावित्रीबाई फुले स्वतंत्र कनिष्ठ महाविद्यालय, शिवणी, ता.किनवट, जि.नांदेड या कनिष्ठ महाविद्यालयाचे बेल्लोरी (धानोरा) ता.किनवट, जि.नांदेड येथे केलेल्या स्थलांतरास कार्योत्तर मान्यतेबाबत.

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
शासन निर्णय क्रमांकः न्यायाप्र १३१६/प्र.क्र.४१८/एसएम-१
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १९ डिसेंबर, २०१८

वाचा :

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. माशास्थ २०१२/(५९/१२) माशि-२, दि. ३१ जुलै,२०१३.

संदर्भ :

१) विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर यांचे क्र.शिउसला/कमवि/एमडीपी/१४९९८/१५०००/ २०१५-१६, दि.२१ सप्टेंबर, २०१५ चे पत्र
२) शासनाचे पत्र क्र.न्यायाप्र १३१६/प्र.क्र.४१८/एस एम-१, दिनांक ९ जून, २०१७
३) मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठाने रिट याचिका क्रमांक ३३५/२०११ मध्ये दिनांक ४ ऑगस्ट, २०१७ चे पत्र.
४) विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर यांचे क्र.शिउसला/कमवि-४/१०६९०/९२/२०१७-१८ दि.४ ऑगस्ट, २०१७ चे पत्र

प्रस्तावना :

ओम एज्युकेशन सोसायटी, सुभाषनगर, किनवट, जि.नांदेड संचलित सावित्रीबाई फुले स्वतंत्र कनिष्ठ महाविद्यालय (कला शाखा), शिवणी, ता.किनवट, जि.नांदेड या मराठी माध्यमाच्या विनाअनुदानित कनिष्ठ महाविद्यालय शासन मान्यतेशिवाय सन २०१०-११ पासून बेल्लोरी (धानोरा) ता.किनवट, जि.नांदेड येथे स्थलांतर करण्यात आले. याबाबत संस्थेने मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्रमांक ३३५/२०११ मध्ये यावर शासनाने निर्णय घेण्याचे निदेश दिले. त्यानुसार संदर्भाधीन क्रमांक (४) येथील पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :

सदर प्रकरणी स्थलांतराबाबत विहीत निकषांची पूर्तता होत नाही, तसेच स्थलांतराच्या ठिकाणी शाळेसाठी पक्की इमारत व आवश्यक सुविधा उपलब्ध नाहीत. यास्तव ओम शिक्षण संस्था, नांदेड संचलित सावित्रीबाई फुले स्वतंत्र कनिष्ठ महाविद्यालय शिवणी, ता.किनवट, जि.नांदेड या कनिष्ठ महाविद्यालयाचे बेल्लोरी (धानोरा) ता.किनवट, जि.नांदेड येथे केलेल्या स्थलांतरास कार्योत्तर मान्यता प्रदान करण्याचा प्रस्ताव अमान्य करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२१९१४५८०८६१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2018.12.19 15:05:35 +05'30'

**( प्रविण मुंढे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, लातूर
३. शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, नांदेड
४. अध्यक्ष/ सचिव, ओम एज्युकेशन सोसायटी, सुभाषनगर, किनवट, जि.नांदेड
५. निवडनस्ती ( एसएम-१).